**यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक व राष्ट्रीय मुक्त विद्यालय शिक्षण संस्था, नवी दिल्ली यांची प्रमाणपत्रे शासनसेवेसाठी समकक्ष म्हणून विचारात घेण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : आरजीडी-१५११/प्र.क्र.८९/१३,
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-४०००३२.
दिनांक : २० मे, २०११.

वाचा

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : आरजीडी-१३९८/प्र.क्र.६७/९८/१३, दिनांक १० डिसेंबर, १९९८.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : आरजीडी-१३०५/प्र.क्र.२४/२००५/१३, दिनांक १२ डिसेंबर,२००६.

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक येथून प्राप्त केलेली शैक्षणिक अर्हता शासकीय सेवेतील नियुक्तीसाठी ग्राहय धरण्याबाबत सर्वसाधारण सूचना निर्गमित करण्याचे निदेश मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई यांनी श्री.राजेंद्र घुणकीकर विरुध्द महाराष्ट्र शासन (मूळ अर्ज क्र.६७०/२००८) वर दिले आहेत. त्यावर, शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार यासंदर्भात खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

"ज्या पदांच्या सेवाप्रवेश नियमात १०वी / १२वी (माध्यमिक / उच्च माध्यमिक) परीक्षा उत्तीर्ण असणे अशी किमान अर्हता विहित केलेली असेल त्या बाबतीत, महाराष्ट्र राज्य शिक्षण मंडळाची माध्यमिक व उच्च माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण नसलेला मात्र, यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापिठाची पूर्व परीक्षा उत्तीर्ण होऊन पदवी परीक्षेचे प्रथम वर्ष उत्तीर्ण झालेला **वा** यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापिठातून पदवी धारण केलेला उमेदवार पात्र समजण्यात यावा."

२. बृहन्मुंबईतील लिपिक-टंकलेखक पदावरील नियुक्तीसाठी विहित करण्यात आलेल्या सेवाप्रवेश नियमातील २ (इ) मध्ये "महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळाने नियंत्रित केलेली माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा आणि या परीक्षेस समकक्ष घोषित केलेल्या इतर परीक्षा अंतर्भूत असल्याचे नमूद केले आहे." तसेच, उमेदवारांकडे महाराष्ट्र राज्यातील अधिवास प्रमाणपत्र असणेही आवश्यक आहे. राष्ट्रीय मुक्त विद्यालय शिक्षण संस्थान, नवी दिल्ली या विद्यालयाची माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण केलेल्या एका उमेदवाराने महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकारणाकडे दाखल केलेल्या प्रकरणात (मूळ अर्ज क्रमांक २०४/२०१०) राज्य शासनाने लवकरात लवकर निर्णय घ्यावा, असे आदेश दिले आहेत. केंद्र शासनाने कायद्यान्वये स्थापन केलेल्या राष्ट्रीय मुक्त विद्यालय शिक्षण संस्था, नवी दिल्ली [National Institution of Open Schooling, New Delhi] या विद्यालयाची माध्यमिक शालांत परीक्षा (किमान ५ विषयांसह) उत्तीर्ण केलेल्या उमेदवारांना शालेय शिक्षण विभागाने अकरावी प्रवेशासाठी पात्र ठरविले आहे. मात्र, शासन सेवेतील नियुक्तीसंदर्भात समकक्षतेबाबत कोणतेही आदेश

नाहीत. केंद्रिय मनुष्यबळ विकास मंत्रालयाने सर्व राज्याना, राष्ट्रीय मुक्त विद्यालय शिक्षण संस्था, नवी दिल्ली [National Institute of Open Schooling, New Delhi] यांच्याकडून दिली जाणारी प्रमाणपत्रे उच्च शिक्षण व नोकरीसाठी (Employment) ग्राह्य (समकक्ष) धरण्याबाबत कळविले आहे. ही बाब विचारात घेऊन, राष्ट्रीय मुक्त विद्यालय शिक्षण संस्था, नवी दिल्ली यांच्यामार्फत माध्यमिक शालांत परीक्षेबाबत दिलेले प्रमाणपत्र, माध्यमिक शालांत परीक्षा अशी अर्हता असलेल्या पदांवर नियुक्तीसाठी ग्राह्य धरण्याची बाब देखील शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर, शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार यासंदर्भात खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

" राष्ट्रीय मुक्त विद्यालय संस्था, नवी दिल्ली यांची (मराठी व इंग्रजीसह किमान ५ विषयांसह) शालांत परीक्षा उत्तीर्ण झालेल्या व सदर प्रमाणपत्र (Secondary School Examination Certificate) धारण करणाऱ्या उमेदवारांनी, राज्य शासन सेवेमध्ये ज्या ज्या ठिकाणी माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण अशी अर्हता विहित केली असेल त्या त्या ठिकाणी शासन सेवेसाठी शालांत परीक्षा समकक्ष पात्रता आपोआप धारण केली आहे असे समजण्यात यावे."

३. त्यानुसार, सर्व नियुक्ती प्राधिकारी यांनी कार्यवाही करावी. हे आदेश या आदेशाच्या दिनांका पासून तात्काळ अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०५२०१३५१०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(बा.वि.निकम)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्रालयीन विभागाचे सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई (* पत्राद्वारे)
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (* पत्राद्वारे)
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (* पत्राद्वारे)
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
अवर सचिव, भारत सरकार, मानव संसाधन विकास मंत्रालय(शिक्षण विभाग), नवी दिल्ली,
निवड नस्ती.